**प्रशासकीय मान्यता**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षात आमदार स्थानिक निधीतून प्राप्त अनुदानातून यंत्र खरेदीस प्रशासकीय मान्यता.

ससून सर्वोपचार रुग्णालय, पुणे

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,

शासन निर्णय, क्रमांक : एसएचपी-२०२०/प्र.क्र. ५२ /प्रशा-१

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,

दिनांक : ३० जानेवारी २०२०

**वाचा** :

१. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.

२. शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.

३. शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८.

४. जिल्हाधिकारी , जिल्हा नियोजन समिती, पुणे नियोजन /आस्थाविका / अनंत गाडगीळ / विपस / निधी वितरण /१९-२० /४६८०/२०१९ , दिनांक १८.११.२०१९

५. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन,मुंबई यांचे पत्र क्रमांक संवैशिवसं / ससरुपु /आस्थाविका / फाऊलर बेड / प्र.मा. / ३- म / ५७८२०/२०२०, दिनांक १७.०१.२०२०

शासन निर्णय :-

ससून सर्वोपचार रुग्णालय,पुणे या संस्थेस आमदार स्थानिक विकास कार्यक्रमातंर्गत मा. विपस श्री. अनंत गडगीळ यांना अनुज्ञेय असलेल्या निधीतून प्राप्त रुपये १२,००,०० ( रुपये बारा लक्ष फक्त ) रकमेची खालील तक्त्यात नमूद यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करण्यास या शासननिर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र | यंत्राचे नाव | नग | प्रतिनग किंमत (रु) | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| | फाउलर बेड | १० | १,२०,००० | १२,००,००० |
| | | | एकूण रुपये | १२,००,००० |

अटी :-

१. सदर प्रशासकीय मान्यता संबधित संस्थेस आमदार स्थानिक विकास कार्यक्रमातंर्गत मंजूर अनुदानातून प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर यंत्रसामुग्री हाताळणीसाठी नव्याने पदनिर्मितीची, बांधकामाची व विद्युतीकरणाची आवश्यकता नाही, याबाबत संचालनालयाने व संबंधित अधिष्ठाता यांनी खातरजमा करावी.

३. सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

४. सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया "औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फामास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत" निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

५. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक (वै.शि.) तसेच संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

६. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वै.शि.) यांनी प्रमाणित करावे.

७. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

८. मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

९. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजुर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०.उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे

अनुपालन केलेल्या यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

२. या प्रयोजनासाठी येणारा खर्च संस्थेस खालील लेखाशिर्षाखालील मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक-ओ १०

| | | |
|---|---|---|
| ४५१५ | - | इतर ग्राम विकास कार्यक्रमांवरील भांडवली खर्च |
| १०२ | - | सामूहिक विकास - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनातंर्गत योजना |
| ०१ | - | बहुउद्देशिय कार्यक्रम नाविन्यपूर्ण योजना (३४५१ १९०१ ) |
| (००) (०१) | - | आमदारांचा स्थानिक विकास कार्यक्रम |
| ४५१५००१२ | - | (योजनातंर्गत )(दत्तमत) ५३ मोठी बांधकामे |

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१३०१५५४०४८७१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN MURLIDHAR RAO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, postalCode=400032, street=MANTRALAYA ,MUMBAI, serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f63f80f0bc4317129bf381eb48778f2e3d, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.01.31 12:54:19 +05'30'

( अ. मु. डहाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - २ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि., मुंबई.
३. जिल्हाधिकारी , चंद्रपूर
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
५. अधिष्ठाता, ससून सर्वोपचार रुग्णालय, पुणे
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
७. निवडनस्ती (प्रशा-१).